महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना (MGNREGA) अंतर्गत पुरवठादार व्यवस्थापन धोरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग (रोहयो प्रभाग)**
**शासन परिपत्रक क्र. मग्रारो-२०२२ /प्र.क्र.७९/रोहयो-७**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दि. : २४ फेब्रुवारी, २०२२**

वाचा : १) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी कायदा, २००५.
२) महाराष्ट्र रोजगार हमी योजना कायदा १९७७ (सुधारित २०१४)
३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-१०८८/(२५१२)/उद्योग-६, दिनांक २ जानेवारी, १९९२
४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४ प्र.क्र.८२/भाग -III/उद्योग-४, दिनांक ३० ऑक्टोबर, २०१५
५) शासन निर्णय क्रमांक: उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग- III/उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६
६) शासन परिपत्रक क्र. मग्रारोहयो -२०२०/ प्र. क्र.२१ /रोहयो-७ दि.०२ सप्टेंबर, २०२०
७) शासन निर्णय क्रमांक: उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०२१/प्र.क्र.८/उद्योग-४, दिनांक ०७ मे, २०२१

**प्रस्तावना-**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना ही मागणी प्रवण योजना म्हणून राबवली जाते. मात्र सदय:स्थितीत राज्य शासनाने मागेल त्याला काम नव्हे तर समृद्ध होण्यासाठी पाहिजे ते काम अशा स्वरूपात योजनेत बदल केला आहे. रोजगार हमी योजनेंतर्गत विवीध कामांचे संयोजन व अभिसरण करुन अकुशल व कुशल संयोजन व अभिसरण करून अकुशल व कुशल प्रमाण योग्य प्रमाणात राखण्यास यामुळे मदत झाली असून अधिकाधिक निधी केंद्र शासनाकडून प्राप्त करून घेणे शक्य झाले आहे.

महाराष्ट्र हे रोजगार हमी योजनेचे जनक राज्य आहे तरीही अन्य राज्यांच्या तुलनेत व प्रत्येक दारिद्र रेषेखालील कुटुंब अन्य राज्यांशी तुलना केल्यास कमी मनुष्य दिवस निर्माण होतात. त्यामुळे गरिबी निर्मूलन हे कायद्याचे ध्येय साध्य होण्यास अडथळा निर्माण होतो. कायद्यातील तरतुदीनुसार महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत कंत्राटदार नेमता येत नाही. तसेच सद्यस्थितीत यंत्रणांकडून एक पेक्षा आधिक पुरवठा धारकाकडून साहित्य खरेदी करण्यात येते, त्यामुळे अपूर्ण कामे मोठ्या प्रमाणावर राहतात व वित्तीय शिस्ती वर नियंत्रण ठेवणे जिकरीचे होते.

सबब महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत वस्तू व सेवा यांचा पुरवठा करण्यासाठी योजनेअंतर्गत कामे हाती घेणाऱ्या क्षेत्रीय यंत्रणांनी शासनाच्या विहित नियमानुसार एकाच पुरवठादार यांचेकडून खरेदी करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाताधिन होती.

**शासन परिपत्रक-**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजने अंतर्गत वस्तू व सेवा यांचा पुरवठा करण्यासाठी योजनेअंतर्गत कामे हाती घेणाऱ्या क्षेत्रीय यंत्रणांनी शासनाच्या विहित नियमानुसार एकाच पुरवठादार यांचेकडून खरेदी करण्यात यावी.

सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक व मुख्य कार्यकारी अधिकारी ,जिल्हा परिषद तथा सहजिल्हा कार्यक्रम समन्वयक यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व यंत्रणांना याबाबत सूचित करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०२२४१६२५३००३१६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by NANDKUMAR VERMA
Date: 2022.02.24 16:30:10 +05'30'

**(नंदकुमार)**
**अप्पर मुख्य सचिव (रोहयो), महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा .मंत्री, रोहयो यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री, रोहयो यांचे खाजगी सचिव.
३. मा .अपर मुख्य सचिव, रोहयो यांचे स्वीय सहायक
४. महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय,मुंबई.
५. आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नागपूर
६. सर्व जिल्हाधिकारी.
७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
८. सर्व उपायुक्त (रोहयो), विभागीय आयुक्त कार्यालये.
९. संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, पुणे.
१०. संचालक (मृद संधारण), कृषी आयुक्तालय, पुणे.
११. मुख्य अभियंता (मृद व जलसंधारण) सर्व.
१२. सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी
१३. सर्व जिल्हा रेशीम अधिकारी.
१४. सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो).
१५. सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (नरेगा, ग्रामपंचायत)
१६. सर्व गटविकास अधिकारी, नरेगा.
१७. उपवनसंरक्षक (सर्व).
१८. उपसंचालक, सामाजिक वनीकरण (सर्व)
१९. निवड नस्ती, रोहयो-७.